## १. जन्मपूर्व कष्टनिवारण

ता: कृष्णवाहे वसुदेव आगते स्वयं व्यवर्यन्त यथा ममो रवे:।
ववर्ष पर्जन्य उपांशुगर्जित: शेषोन्वगाद वारि निवारयन् फणै:।।
**श्रीमद्भागवत, १०–३–४९**

**अर्थशक्ति :** मंत्रात नऊ प्रकारची शक्ति असते त्यात अर्थशक्ति ही क्रमांक दोनची शक्ति. कृष्णजन्मानंतर बंदिवासातून निसटताना वसुदेवाने कृष्णाला हातात घेतल्याबरोबर, सूर्याने अंधार निवारावा तशी संकटे दूर झाली. पाऊस पडत होता. पण शेषाने छत्र धरून ती वृष्टि वरच्यावर झेलली.

**वैज्ञानिक शक्ति :** सुरूवात नावाला मध्यम शक्तीने झाली असली तरी शब्दरचनेत सर्वत्र प्रबल शक्तींचे सामर्थ्य आहे. नैसर्गिक अकारान्त उच्चार सोडला तर श्लोकात चौऱ्याऐंशी वर्ण आहेत. पैकी सौम्य व मध्यम शक्तींचे प्रत्येकी तेवीस आहेत. तर प्रखर शक्तीचे अडतीस (पन्नास टक्क्यांपेक्षा अधिक) आहेत.

**उपयोग:** मातेला मुलाच्या जन्मापूर्वी कष्ट पडण्याचे भय असते. हा मंत्रपाठ रोज सकाळी केला, तर प्रसूति व वेळच्या अडचणी सुलभ होतील. मुलावर शक्तीचे, दैर्याचे चांगले संस्कार होतील.

## २. बालरोग प्रतिबंध

हस्ताग्राह्ये रचयति विधिं पीठकोलूखलोद्ये ।
श्छिद्रं ह्यन्तर्निहितक्युन: छिक्यमाण्डेषु तद्वत्।।
ध्वान्तागारे धृतमणिगणं स्वाङ:गमर्थप्रदीपं ।

काले गोप्यो यर्हि गृहकृत्येषु सुव्यग्रचिताः।। भाग.१०–८–३०

**अर्थशक्ति :** कृष्ण खोड्या करून शेजारपाजारच्या गौळणींना त्रास देऊ लागला. दही, दूध चोरू लागला. तेव्हा. त्या साऱ्या गौळणी कृष्णाविरूद्ध तक्रार करावयास यशोदेकडे आल्या. वयाच्या मानाने कृष्णाचे चातुर्य, चपलता व 'अंधारातहि वस्तु हुडकण्याचे त्याचे सामर्थ्य' याबद्दल गौळणींची कौतुकपूर्ण तक्रार होती.

**वैज्ञानिक शक्ति :** सुरूवात व शेवट प्रखर शक्तीचा व इतर सर्वत्र मध्यम शक्ति व प्रखर शक्तीपेक्षा अधिक अशी शब्दसामर्थ्याची रचना दिसते. प्रखर शक्ति वर्ण ५२ तर मध्यम ४२ म्हणजे त्यापेक्षा दहाने कमी आहेत.

**उपयोग :** लहानपणी पुष्कळदा मुले उशीरा बोलायला लागतात. त्यावेळी आईवडिलांना काळजी वाटते. काही मुले मंदपणाने हालचाल करतात. त्यांना समज कमी असते. स्पष्ट रोगाचे काही निश्चित चिन्ह नसते, पण त्यांची वाढ खुरटेपणाने होते. या सर्व गोष्टींनी मातापित्यांना फार काळजी वाटते. अशा वेळी सकाळी व रात्री प्रार्थनेनंतर मंदस्वरांत हे मंत्रशब्द मुलासमोर उच्चारावे. उच्चार अवघड वाटला तर मनात वाचावे. त्यामुळे बालकावर सर्वसाधारण परिणामही चांगला होईल.

## ३. मुलांच्या अति खोडसाळपणावर

कृष्णस्तु गृहकृत्येषु व्यग्रायां मातरि प्रभुः ।
अद्राक्षीदजुर्ना पूर्व गृह्यकौ धनदात्मजौ ।। भाग. १०–९–२२

**अर्थशक्ति :** कृष्णाच्या खोड्यांविरूद्ध फार तक्रारी आल्या, तेव्हा यशोदा मातेने कृष्णाला उखळाशी बांधून टाकले. मग ती बिचारी कामाला लागली. इकडे छोट्या कृष्णमहाराजांनी बाजूच्या अर्जुन-वृक्षांना मुक्ति देऊन टाकली. ते पूर्वकर्मामुळे वृक्ष रूपात आलेले मूळचे कुबेरपुत्र होते. अर्थ दोन. रूपक अपराधाला रूपक शिक्षा देवालाही मिळते. अशा तऱ्हेने त्याची 'अपराधमुक्ति' होत असतांना, इतरांना तो मदत करीत असतोच. म्हणजे देवाचे 'अपराध' लोकशिक्षणासाठी व प्रायश्चित्तहि त्याच कारणासाठी. मुलगा झोपल्यावर मंत्र म्हणावा.

**वैज्ञानिक शक्ति :** या मंत्रात सौम्य शक्ति कमी (सतरा वर्ण) प्रखरशक्ति त्यापेक्षा थोडी अधिक (बावीस वर्ण) व मध्यमशक्ति सर्वाधिक आहे.

**उपयोग :** मुले फार खोड्या करीत असतील तेव्हा त्यावर बंधन घातले जावे, त्यांच्यातली सत्प्रवृत्ति सुटू नये, यासाठी या मंत्राचा उपयोग चांगला होईल. मुलगा झोपल्यावर त्याच्यासमोर मंद आवाजात दोनदा हा मंत्र म्हणत जावा. त्याला प्रार्थनेची आवड असली तर त्याच्याकडूनही म्हणवून घ्यावा.

## ४. मुलाच्या अप्रियतेवर उपाय

इत्युक्त्वैकेन हस्तेन कृत्वा गोवर्धनाचलम्।
दधार लीलया कृष्णश्छत्राकमिव बालक:।।

**भाग.१०-२५-१९**

**अर्थशक्ति :** विश्वासपूर्ण वाणी उच्चारून कृष्णाने गोवर्धन पर्वत उचलला. छोटी मुले पावसाळ्यात (कावळ्याच्या) छत्र्या सहज उचलून खेळतात, तसाच त्याने पर्वत उचलला. पण याचा भावार्थ अधिक आहे. सहकाऱ्यांना कृष्णाने पर्वत उचलण्यास हात लावू दिले. जसे काही त्यांना पण त्या महान् प्रसंगाचे श्रेय होते. कृष्ण सर्वप्रिय अशाचा कृत्यांनी झाला. त्यामुळे त्याला स्वत:च्या शक्तीबरोबर इतरांच्या प्रेमाची शक्तिही मिळाली.

**वैज्ञानिक शक्ती :** या मंत्रात मध्यम शक्तीचेच प्राबल्य स्पष्ट आहे. सौम्य शक्ति तेरा वर्णाची, प्रखर तीस वर्णाची, तर मध्यमशक्ति पंचवीस वर्णाची आहे.

**उपयोग :** आपला मुलगा किंवा मुलगी सहकाऱ्यांना अप्रिय होत असली किंवा इतरांशी भांडणे जास्त होत असली तर या मंत्राचा उपयोग चांगल्या तऱ्हेने होऊ शकेल. उच्चाराची पद्धत मागल्या मंत्राच्या वेळी सुचवली आहे. तीच वापरावी. कर्मशुद्धी तंत्रात विद्यार्थी साहाय्य समाविष्ट करणे उपयुक्त ठरेल.

## ५. कलागुणाने लोकप्रियता वाढवण्यास

इति वेणुरवं राजन् सर्वभूतमनोहरम् ।
श्रृत्वा व्रजस्त्रिय: सर्वा वर्णयन्त्यो भिरेभिरे ।।

**–श्रीमद्‌भागवत १०–२१–६**

**अर्थशक्ति :** मागील मंत्राप्रमाणे या श्लोकातहि शब्दापेक्षा सुप्त

भावार्थ अधिक आहे. वेणुनादामुळे व्रजस्त्रिया कृष्णाकडे निकट आकर्षित झाल्या. हा श्लोकाचा उत्तरार्ध खरा, पण या वेणुनादाने सर्व जड व चेतनाचे चित्तहरण केले. हा पूर्वार्ध अधिक अर्थगर्भ आहे. कलागुणसुद्धा जेव्हा अतिप्रकर्षात पोहोचतो तेव्हा तो सृष्टीशी सर्वांगाने समरस होतो. सर्व आसमंत या कलात्कर्षाकडे आकर्षित होतो.

**वैज्ञानिक शक्ति :** या मंत्रात मध्यम लहर शक्तींचे प्राबल्य स्पष्ट आहे. दीर्घ लघु लहरशक्ति एकाच वर्णसंख्येची दिसते. मध्यम शक्तिवर्ण अठ्ठावीस, लघु पंधरा व दीर्घलहरी शक्तीहि पंधराच आहेत. नेहमीप्रमाणे 'अ'कारांत वर्गोच्चार सोडले तर एकूण वर्ण अठ्ठावन्न, त्यात अठ्ठावीस वर्ण वर म्हटल्याप्रमाणे मध्यम शक्तीचे.

**उपयोग :** कलावंत कला साधना करीत असतांना त्या शक्यतो साधनेत एकरूप हे अखेरचे साध्य म्हणून मानले पाहिजे. त्या ध्येयाकडे जाण्याच्या मार्गात हा मंत्र उपयोगी पडेल. हा मंत्रोच्चार कर्मशुद्धि तंत्रासह कलावंताने स्वत: करावयाचा आहे. हमखास उपयोग होईल.

## ६. शत्रुनाश

तं सम्परेतं विचकर्ष भूमी।
हरिर्यथेमं जगतो विपश्यत:।।
हाहेति शब्द: समुहाँस्तदाभू।
दुदीरित: सर्व जनैर्नरेन्द्र।।

**– श्रीमद्‌भागवत १०–४४–३८**

**अर्थशक्ति :** कृष्णाने कंसाचा वध केल्याचा क्षण येथे टिपला आहे. सर्वांसमोर कंस भूमीवर अखेरचा कोसळला. सिंह हत्तीच्या अंगावर सरी करतो तशीच ही गोष्ट झाली. 'हाय,हाय' करणारा कंसराजाचा आवाज ऐकू येत होता. या श्लोकात दुरितनाशाचा प्रसंग उत्कृष्ट वर्णिलेला असल्याने परिणामी मंत्रशक्ति साकल्याने एकत्र झाली आहे. मात्र शत्रु कंसाइतका खरोखरीच दुरित, दुराचारी आहे, ही पार्श्वभूमि मनात बाळगली पाहिजे. एवढे खरे.

**वैज्ञानिक शक्ति:** 'अ'कार सोडून एकूण ऐंशी वर्ण असलेल्या या मंत्रात अठ्ठावीस लघुलहर शक्तिवर्ण, बत्तीस मध्यम शक्तिवर्ण, व वीस दीर्घ लहरशक्ति वर्ण दिसतात. मात्र मध्यम शक्तिवर्ण लघुलहर शक्तिवर्णापेक्षा फक्त चारने जास्त आहेत व दीर्घ लहर तरंगशक्ति एकूण कमी आहे. याचा अर्थ प्रखर शक्ति बरीच असली तरी त्याला संयम शक्तीची झालर दिसते.

**उपयोग:** या दृष्टीने शत्रुनाशात संयम आवश्यक आहे. वर म्हटल्याप्रमाणे कंसासारखा दुष्ट मारण्यासाठी देव शक्ति वापरतो आणि या पुढील श्लोकांतच (१०-४४-३८) वर्णन केल्याप्रमाणे साक्षात् देवाला शक्ति वापरण्याची पाळी आली. एवढ्या पुण्यावरही कंसाला कृष्णात विलीन होण्यासारखी सारूप्य मुक्ति मिळाली. सारांश, शत्रुनाश मंत्र वापरताना किती संयम व तारतम्य हवे हे लक्षात येईल. कर्मशुद्धितंत्र अशा मंत्राबरोबर अविभाज्यपणाने आवश्यक आहे.

## ७. लग्नयोग जुळत नसल्यास

ततौ ययो रामपुरागमै:शनै: ।
सृगाल मध्यदिव भागऱ्हद्धरि: ।।
**–श्रीमद्‌भागवत्,१०–५३–१६**

**अर्थशक्ति :** लग्न न जुळण्याची अनेक कारणे आहेत. योग्य कारण नसूनहि विशिष्ट परिस्थितीत कधीकधी लग्नाला घरची माणसे विरोध करतात. अशा वेळी हा मंत्र उपयोगी पडेल. रूक्मिणी स्वयंवरापूर्वीचा, रूक्मिणीहरणाचा हा प्रसंग, हे सामर्थ्य देऊन जातो. सिंह आपला भाग जसा हक्काने ऐटीने, उचलून घेऊन जातो त्याप्रमाणे कृष्णाने रूक्मिणीला नेले, असा येथे भावार्थ आहे. मात्र सिंहाची ऐट, सामर्थ्य, सहजता या गोष्टी तुम्हाला केव्हा मिळतील ? कृष्णाला मिळाले ते याबाबत तुम्हाला हवे असेल तर न्याय तुमच्या बाजूस हवा.

**वैज्ञानिक शक्ति :** नैसर्गिक 'अ'कार सोडून चाळीस वर्ण असलेल्या या मंत्रसमुच्चयात, लघु–लहर–तरंग शक्तीचे प्रमाण जवळजवळ मध्यमशक्ति इतकेच आहे. चाळीसपैकी सोळा मध्यम शक्तियुक्त, पंधरा तीव्र शक्तिशाली व फक्त नऊ मंद शक्तीच्या वर्णातील शक्तींनी हा श्लोक बांधला आहे, कारण मंदशक्तीचे या वातावरणात काम काय ?

**उपयोग :** प्रथमच म्हटल्याप्रमाणे लग्न कोणत्या कारणाने होत नाही, त्यावर या मंत्राचा उपयोग होईल की नाही, ते अवलंबून राहील. एरवी लग्न न होण्याच्या इतर कारणांसाठी वेगवेगळ्या मंत्रशक्ति कामी लावाव्या लागतील. योग्य व्रताने हा मंत्र शुद्ध करून घेतला, म्हणजे वर

वर्णिलेल्यासारख्या प्रसंगी हमखास यश मिळेल.

## ८. निंदकाला दंड

तद्विज्ञाय महासत्वो भीमः प्रहरतां वरः
गृहित्वा पादयोः शत्रुं पातयामास भूतले ।।
–श्रीमद्भागवत,१०–७२–४४

**अर्थशक्ति :** ''निंदकाचे घर असावे शेजारी'' हे श्रेष्ठ सत्य असले तरी तुकाराममहाराजांनी सालोमालोचे ताडण केलेच. कारण 'निंदक तो परउपकारी''या दुसऱ्या अभंगाच्या शेवटी महाराजांनी सांगितल्याप्रमाणेअसा निंदक शेवटी नरकात जातो. तेव्हा त्याला यथासमय, वेळेवर,दंडासहितसुद्धाजागे करण्याचे काम करावे लागते. शिशुपालाला शंभर अपराध कृष्णाने करू दिले. अपराधांची हद्द झाली की त्या त्या दानवाला दंडा मिळाला. अशा वेळी दानवदंडाची शक्ति देवाजवळ असते व ती त्यावेळी न्यायामुळे अर्थगर्भ होते. हा प्रसंग भीमाने जरासंधाला मारण्याचा होता. कृष्णाने भीमाला जरासंधाचे दौर्बल्य कोणते, याचा संकेत केला. आणि हां हां म्हणता भीमाने जरासंधाला धरतीवर आपटले.

**वैज्ञानिक शक्ति :** संयम व शक्ति हातात हात घालून जाव्या, त्याप्रमाणे येथे लघु लहरी लांबी शक्तीची तीव्रता आणि मध्यम शक्ति या समसमान आहेत. नैसर्गिक 'अ'कार सोडून अठ्ठावन्न वर्णांनी बांधलेल्या या मंत्रपंक्तींमध्ये मध्यम व तीव्र शक्तिवर्ण केवळ, प्रत्येकी बावीस आहेत व मंद शक्तिवर्ण केवळ चौदा आहेत.

**उपयोग :** न्याय तुमच्या बाजूला असला पाहिजे. सहन करून, निंदकाच्या हितासाठी त्याला शासन करण्याची उच्च प्रेरणा तुमच्याजवळ असली पाहिजे. मग देवाला साकडे घालावे की, ''देवा, तेव्हा भीमाला सुचली तशी युक्ति मला सुचो.'' तर तुमचे यश अटळ आहे. कारण येथे सूडापेक्षा तुमच्या मागे सर्वंकष न्यायभावना प्रज्वलित आहे. तुमचे आवाहन देवाला आहे, दैत्याला नाही. अर्थात् अशा मंत्रसिद्धिस व्रत शुद्ध व कडक हवे.

## १०. धनवैभव प्राप्ति मंत्र–उपाय

**योऽसौ त्रिलोकगुरूणा श्रीनिवासेन संभ्रूतः ।**
**पर्यङकस्थां श्रियं हित्वा परिष्वक्तोऽग्रजो यथा ।।**
**–श्रीमद्‌भागवत, १०–८०–२६**

**अर्थशक्ति :** श्लोक नऊ मध्ये आपण जे पूर्वविवेचन केले ते काहीसे येथेहि लागू आहे. या श्लोकात सुदाम्याची कृष्णाने जी सेवा केली त्याबद्दल अंत:पुरातील स्त्रियांचा विस्मय व्यक्त होतो. सुदाम्याचे कृष्णाने बलरामासमान प्रेमादरपूर्वक लाड चालविले होते. आणि तेसुद्धा रूक्मिणीला सोडून चालविले होते. या उद्‌गारांत विपदावस्थेतील कृष्णभक्तांना दिलासा देण्याचे सामर्थ्य आहे. सामाजिक योग्यतेकडे न पाहता सस्नेही व्यक्तीला कृष्ण आपली शक्ति देईल, या शब्दाने आपद्ग्रस्तांना दिलासा मिळणार नसेल, तर तो कशाने मिळेल?

**वैज्ञानिक शक्ति :** यांत अवघे पाव नैसर्गिक 'अ'कार आहेत.

ते सोडून एकूण अडुसष्ट वर्णांच्या या श्लोकशक्तीमध्ये लघु-तरंग-शक्तीचे प्राबल्य आहे. अडुसष्टपैकी सौम्य शक्तीचे फक्त एकोणीस वर्ण मध्यम शक्तीचे तेवीस आणि लघु-लहर-तरंग-शक्तीचे आणि म्हणूनच प्रखरशक्तीचे सव्वीस वर्ण आहेत. दिलासा देण्यासाठी प्रखरशक्ति असणे आवश्य आहे, अशा जाणिवेनेच जणू येथे प्रखरशक्ति प्रज्वलित दिसते.

**उपयोग:** सुदामकथेत काही ठिकाणी भिन्नता आढळते. सुदाम पत्नीसह आग्रहाने कृष्णाकडे गेला. तरी त्याने कृष्णाकडे धन मागितले नाही. कृष्णाने काहीही धन न देता त्याला परत पाठवले, म्हणून तो किंचित निराश झाला, तरी त्याची निराशा फार काण टिकली नाही. कृष्णाने केले ते योग्यच असे तो समजला आणि तो गावी परतल्यावर त्या समाजचेच सोने झाले. कृष्णभक्ति जितक्या निर्लेपपणाने होईल तितक्या निर्लेपपणाने हे सोने कोणत्याहि कृष्णभक्ताचे होऊ शकेल. मंत्रशक्ति शुद्ध करण्यासाठी विद्यार्थ्याला शक्तीप्रमाणे निदान भोजन शिजवून घालणे एवढे व्रत 'सुदाम्याचे पोहे' सुचवतात. निराश प्रसंगात किंवा रात्री श्लोक म्हणावा.

## ११. ईश्वरी कृपा होण्यास

ततोऽनुयायिभिः सार्धं मरुद्भिरिव वासवः ।
विदुरान्नानि बुभुजे शुचीनि गुणवन्ति च ।।

**महाभारत, उद्योगपर्व ९१-४१**

**अर्थशक्ति :** या श्लोकात विदुराच्या घरी जाऊन कृष्णाने अन्नग्रहण केल्याचा प्रसंग आहे. तो या दृष्टीने अर्थगर्भ आहे. गरीब विदुराकडे

गेल्यावर श्रीकृष्णाने इतरांना, विशेषत: वेदज्ञानियांना, अन्नदान देऊन तृप्त केले, असा चाळिसाव्या श्लोकात उल्लेख आहे. परोपकारात ही ज्ञानप्रियता कृष्णांनी राखली आहे. एक्केचाळीसाव्या श्लोकात कृष्णांनी अन्नसेवन केल्याचा उल्लेख आहे. वर श्लोक अठरा व श्लोक चोवीस ते बत्तीसमध्ये खुद्द दुर्योधनाचा राजसत्कार, राजभोजन नाकारले असा उल्लेख आहे.

**वैज्ञानिक शक्ति:** श्लोकात नैसर्गिक 'अ'कार एक आहे. तो सोडून एकसष्ट वर्णयुक्त श्लोकात सौम्यशक्तीचे प्रमाण मोठे आहे. सोळा वर्ण तीव्र शक्तीचे, बावीश मध्यम शक्तीचे व तेवीस सौम्य म्हणजेच दीर्घ-लहर-तरंग लांबी शक्तीचे आहेत. भक्तांकडे शांतीने जेवतांना सोम्यशक्तींचेच काम होते.

**उपयोग:** ईश्वरी कृपा होण्यासाठी अडथळा होतो तो ईश्वराकडून होत नाही. गरिबी किंवा दर्जा या गोष्टीहि अडथळा आणीत नाहीत. सुदाम्याची गरिबी किंवा विदुराचा कृष्णापेक्षा कमी दर्जा, कृष्णकृपेआड आला नाही. जो भक्त ही गोष्ट समजेल, ही खूणगाठ मनात बांधेल, त्याला ईश्वरी कृपा खात्रीने मिळेल. खऱ्या ईश्वरवासियांना विदुराचे हे उदाहरण आश्वासनगर्भ आहे. सकाळी व इतरहि वेळी, विशेषत: जेवण्यापूर्वी एकदा तरी श्लोक म्हणावा.

## १२. कौटुंबिक कुचंबणेतील मन-उपाय

उत्सन: कुलधर्माणां मनुष्यबाणां जनार्दन ।
नरकेऽनियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम ।।

**-गीता १-४४**

**अर्थशक्ति :** आपलेच नातोईक मारावयाचे या कल्पनेने हादरलेला अर्जुन कृष्णांना म्हणतो, ''कुलधर्म नष्ट झालेला माणूस नर्कात जातो, असे आम्ही ऐकत आलो.'' देवाजवळ शंका व्यक्त केली, म्हणजे प्रथम मन मोकळे होते. हे प्राथमिक अवस्थेतील सत्य आपण जाणले तर, त्या ज्ञानातच एक प्रकारची 'प्रकटनमुक्तता' (एर्शिीीळेप ीशश्रळशष) मिळाल्याचे समाधान लाभते. या प्रसंगाचे पुनर्स्मरण आणि अप्रत्यक्षपणे साफल्य आश्वासन देण्याची शक्ति या मंत्रात आहे. (सेहेचाळीस सत्तेचाळिसाव्या श्लोकात अर्जुन शस्त्रे टाकून मरावयास तयार झाला.) टायफॉइडमधून उठलेला माणूस नंतर प्रकृतीत लौकर भरतो. पूर्वी आतड्यांना विश्रांती देण्याची औषधयोजना असे, तेव्हा तरी पुष्कळदा असे दिसे. आयुष्यातील दुःख काढून टाकण्याची योजना म्हणजे प्रथम 'आजार किंवा 'संकट' यांची अवस्था प्राप्त झाली पाहिजे. ती अर्थपूर्ण आहे.

**वैज्ञानिक शक्ति:** नैसर्गिक, 'अ'कार सोडून एकूण वर्ण अडुसष्ट. त्यात तीव्र शक्तीचे तेरा, मध्यम शक्तीचे सत्तावीस म्हणजे सर्वाधिक व उरलेले अठरा सौम्य शक्तिप्रधान, शंकेच्या प्राथमिक अवस्थेमुळे मध्यम शक्तीचे प्राबल्य दिसते. 'देवापुढे शंका' ही गोष्ट अर्जुनाला मनातून पटली नसल्याने तीव्र शक्तिव्याचा असंभव असावा.

**उपयोग:** गीतेतील हताश झालेल्या अर्जुनाने एका तऱ्हेचे मानवजातीवर उपकार केले. त्यामुळे गीतेचे तत्वज्ञान साकार झाले. देवापाशी आपले मन मोकळे केले असताना अशा भक्तांचे नव्हे तर, मानवजातीचे कल्याण होण्याचा संभव असतो, तो या श्लोकाच्या निमित्ताने दिसतो. संसारात अनेक प्रसंग येतात की, जेथे कर्तव्य कोणते' अशा शंकेने मन

गोंधळून जाते. अशा प्रसंगी कृष्ण समोर उभा आहे. अशी कल्पना करून हा श्लोक शांतपणे म्हणावा. जणू तुमची कथा तुम्ही उच्चारीत आहात, कालांतराने तुमची उत्तरे तुम्हाला मिळत गेल्याचा प्रत्यय येईल, जशी कृष्ण तुम्हाला व्यक्तिगीता सांगेल. नेहमीप्रमाणे कर्मशुद्धि व्रत आवश्यक.

## १३. दु:ख न येण्यासाठी

मात्रास्पर्शास्तु कोन्तेय शीतोष्णसुखदु:खदा:
आगमापायिनोऽनित्या । स्तांस्तिनिक्षस्व भा
–गीता २–१४

**अर्थशक्ति :** भगवान कृष्ण अर्जुनाला उपदेश करतात की, शीत आणि उष्ण, सुख आणि दु:ख व (हि सर्व तुला ज्याने कळते तो ) इंद्रिय आणि विषय याचा संयोग ही सर्व क्षणिक आहेत, (हे तू जाण म्हणून तू धैर्याने सोस. कृष्ण अर्जुनाला सारांशाने येथे सांगतात की, एकदा शरीर धारण केले की, सुख–दु:खाचे रहाटगाडगे आपोआप येतेच. यापैकी सुख कोणी नाकारीत नाही, व दु:खाबद्दल तक्रार करण्याचे कोणी सोडत नाही. कृष्ण येथे दु:ख सोसण्याच्या ज्ञानाची कल्पना स्पष्ट करतात.

**वैज्ञानिक शक्ती :** या श्लोकात नैसर्गिक ‘अ’ सोडून एकूण सहासष्ट वर्ण आहेत. त्या मध्यम शक्तीचे प्राबल्य आहे. मध्यम शक्तीचे पंचवीस. त्याखालोखाल दीर्घलहर–तरंग–लांबी–शक्तीचे फक्त अठरा आहेत. सहन करण्याजोगे जे शांत सातत्य अभिप्रेत आहे, त्याचे प्रतिबिंब या शक्तिविभागणीत पडलेले दिसते.

**उपयोग :** सतत दु:खावश भय बाळगणाऱ्यांना या मंत्राचे मार्गदर्शन केवळ अप्रतीम आहे. गीतेच्या पाचव्या अध्यायात बावीस व तेवीस श्लोक, यापेक्षाहि ठसठसीतपणे ही गोष्ट सांगतात. पण येथे ते तत्व स्पष्ट केले आहे. याचे महत्व असे की, दुसऱ्या अध्यायात अर्जुनाचा विषाद संपविण्यासाठी भगवंतानी जी सुरवातीला सूत्रे उच्चारली त्यातच ते गाविले आहे. देवी येऊ नयेत म्हणून देवी टोचून घेण्याच्या युगात, दु:ख येऊ नेय म्हणून दु:ख टोचून घया, हा भगवंतांचा उपदेश वैज्ञानिक प्रतिष्ठा पावेल, प्रयोगांति त्याचा अनुभव येतोच येतो.

## १४. पाखडू न देण्याचा मंत्र

**कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादय:**
**लोकसंग्रहमेवापि संपश्यन्कर्तुमर्हसि ।।२० ।।**
**–गीता ३–२०**

**अर्थशक्ति :** गीतेच्या तिसऱ्या अध्यायात भगवान कृष्ण आदर्श चरित्राचे वर्णन करीत आहेत. तिसऱ्या अध्यायाच्या आरंभी अर्जुनाचा गोंधळ उडाला असे वर्णन आहे. तो गोंधळ नाहीसा करण्यासाठी कृष्णाने कर्माचे काही नियम सांगितले. या नियमापैकी एका नियमाप्रमाणें अनासक्त कर्म करण्याची सूचना होती. त्या संदर्भात विसाव्या श्लोकात भगवान सांगतात, ''जनकादिकांनी याप्रमाणे कर्म करून पूर्णता मिळविली. लोकसंग्रहाकडे बघायचे तर तुला अशा तऱ्हेने कर्म केले पाहिजे.'' अशा तऱ्हेने कर्माने लोकसंग्रह होतो. ज्याच्याबद्दल कृष्णालाही आदर असा जनक महाभाग्यवान हे सिद्ध आहे. अशी सिद्धि मिळविण्यासाठी पुण्य करणे.

पाप फेडून टाकणे, किंवा पाप-पुण्याचा हिशोब एकाचवेळी मिटविणे, असे चार सम पर्याय दिसतात. यापैकी जनक-चरित्रात चौथ्या प्रकाचे प्राबल्य दिसते आणि हे चारहि मार्ग समशक्तीचे असल्यामुळे या मंत्रात, पाप घडूच न देण्याची शक्ति स्पष्ट होते.

**वैज्ञानिक शक्ति :** नैसर्गिक 'अ 'कार सोडून एकूण अठ्ठावन्न वर्णशक्तींनी हा श्लोक बांधला आहे. त्यात मध्यम शक्तीचे प्राबल्य आहे. मध्यम चोवीस, लघु लहरी युक्त म्हणजे प्रखर शक्तीचे वीस व उरलेले सौम्य शक्तीचे चौदा, अशी वाटणी आहे. समतोल शिकविणारा मंत्र मध्यमशक्तीने बांधला गोला, यात विशेष आश्चर्य नाही.

**उपयोग :** या श्लोकातलि शक्ति पाप होऊ न देण्याची प्रेरणा देईल. पुष्कळदा व्यवहारात आपण पाप करणार, हे समजते आणि करू नये हेहि समजते. पण तसे पाप आपल्या हातून होईल. अशु भीतीहि मनात राहते. अशा वेळी पाप आणि प्रायश्चित्त, कर्म आणि प्रतिकर्म, सुख आणि दु:ख याचे एकत्रीकरण किंवा समता करून हे पाप टाळता येईल. जनक एका पायाला अग्नि बांधून राज करीत होता, अशी आख्यायिका आहे. अशा समतेचे प्रतीक म्हणून डोळ्यासमोर उभा असलेला हा जनक या मंत्रात महान शक्ती देतो. मात्र जनकाप्रमाणे कर्म करतांनाच कर्मशुद्धीचे व्रत घेतले पाहिजे. त्या युक्तीने आणि, जनकाच्या या शक्तीने, हातून घडणारे पाप पुण्यमय होऊन जाईल. निदान पुष्कळ आवाक्यांत येईल.

## १५. गोंधळलेल्या मनावर मंत्र–उपाय

न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।
तत्स्वयं योग संसिद्धः कालेनात्मनि विंदति ।।
–गीता ४–३८

**अर्थशक्ति :** ज्ञानापेक्षा श्रेष्ठ दुसरी गोष्ट असू शकत नाही. भगवान श्रीकृष्णांनी ज्ञानाला 'पवित्र' म्म्हटले आहे. आपल्यापेक्षा कनिष्ठ व्यक्तींबद्दल, वस्तूबद्दल आपल्याला प्रेम वाटते, बरोबरींच्याबद्दल सख्यत्व आणिा उच्चाबद्दल आदर वाटतो, 'पवित्रता' वाटते. श्रीकृष्ण, ज्ञान हे 'पवित्र' म्हणजे स्वत:पेक्षाहि श्रेष्ठ मानतात, ही सूचना येथे अर्थगर्भ आहे. भगवान स्पष्टपणाने सांगतात– ''या लोकी निश्चयाने आत्मज्ञानासारखे पवित्र दुसरे काही नाही,'' म्हणून ते ज्ञान, काही काळ कर्म करीत असल्याने कर्मयोगाने योग्यता प्राप्त झालेला पुरूष आपल्याच ठिकाणी आत्मज्ञानरूपाने स्वत: अनायासे मिळवितो.

**वैज्ञानिक शक्ति :** या श्लोकात नैसर्गिक 'अ' सोडून चौपन्न वर्ण आहेत. नैसर्गिक अ सोडून असे प्रत्येक वेळी लिहितो तेव्हा प्रत्येक 'अ'कारांत शब्दाची नैसर्गिकता तेथे अभिप्रेत असते. पण 'ज्ञान' श्रेष्ठतेच्या माहात्म्य कथनात, येथे धर्मविज्ञानाचा संयोग सांगण्यास हरकत नाही. दहाव्या अध्यायातील विभूतियोगात तेहेतिसाव्या श्लोकात कृष्ण स्वत: 'अ' मध्ये आहेत, असे सांगतात. नकळत मूळ शक्तींचे अस्तित्व सृष्टीत कसे प्रगट होत राहते याचा हा एक नमुना होय. ती नैसर्गिक सुप्त शक्ति सोडून या श्लोकातील मंत्रशक्ति चोपन्न वर्णाची बांधली आहे. त्यात बावीस मध्यम

शक्तिवर्ण, अठरा प्रखर शक्तिवर्ण व सौम्य शक्तिवर्ण चौदा आहेत. एकूण ज्ञानश्रेष्ठता वर्णनात मध्यम शक्तींचे प्राबल्य आहे.

**उपयोग :** ज्ञानप्रशरकतेची शक्ति येथे आहे. ज्ञानाच्या आकांक्षेला ती सर्वस्वी पूरक आहे. ज्ञान हे गोंधळलेल्या मनाच्या कोणत्याहि अवस्थेवर रामबाण उपाय आहे. त्याचे आवाहन करणारा हा मंत्र म्हणावा. १८६ दिवसात एक नवा प्रकाश दिसेल, तसे समाधान लाभेल. सद्भावी विद्यार्थ्यास भोजन देण्याचे व्रत पूरक आहे.

## १६. आलेले दु:ख जाण्यासाठी

शक्नोती हैव यः सोढुं प्राक्शरीर विमोक्षणात्
कामक्रोधोद्भवं वेगं सयुक्तः स सुखी नरः ।।२३।।

**–गीता ५–२३**

**अर्थशक्ति :** तेराव्या मंत्रशास्त्रात आपण जो अर्थ पाहिला त्याच्याच पुढली पायरी येथे सांगितली आहे. आलेले दु:ख ही साक्षात् सहन करण्याची गोष्ट असल्याने नुसत्या तत्वज्ञानाने दु:खी माणसाला धीर निघत नाही. पण त्याला इलाज तरी काय? वस्तुस्थिती लपविता येणार नाही. अग्नीची ज्वाळा लपविण्यासाठी वर टाकलेला कपडा स्वत:च जळून जाणार. दु:खाबद्दलची तक्रार केल्यामुळे ते दु:ख नष्ट होणार नाही किंवा लपले जाणार नाही, उलट वाढेल. यातून सुखाची प्राप्ती होण्याचा मार्ग म्हणजे दु:ख स्वीकारच. ही गोष्ट न लपविता ठसठशीतपणे गीतेने येथे सांगितली आहे. श्रीकृष्ण म्हणतात, ''काम, क्रोध यांच्यापासून जे वेग निर्माण

होतात ते वेग म्हणजे किंवा क्षोभ (प्रगट करण्याऐवजी) मरेपर्यंत सहनच करणारा मनुष्य ज्ञानी होय. असा मनुष्य या जन्मीच सुखी होऊ शकेल.'' सुखाचा अर्थ, व्याख्या आणि गुरूकिल्ली सांगणारा हा महामंत्र आहे.

**वैज्ञानिक शक्ति:** नैसर्गिक 'अ'कार सोडून एकूण सत्तावन्न लहर तरंग-शक्तीचे वर्ण सतरा, सौम्य शक्तीचे सोळा आणि मध्यम शक्तीचे चौतीस असा हिशोब आहे. महत्वाची गोष्ट अशी की, तेराव्या श्लोकात याच तऱ्हेचा उपदेश असताना, मध्यम शक्तीचेच प्राबल्य होते.

**उपयोग :** सत्याचे ज्ञान झाले म्हणजे दु:ख त्या मर्यादेपर्यंत कमी होते. वस्तुस्थितीचा धक्का, तिची जाणीव आधी बाळगून त्याप्रमाणे तयारी केली, तर तेवढा बसत नाही. क्रोधापासून शरीरावर विविध परिणाम, दुष्परिणाम होतात हे डॉ. अलेक्झांडरसारख्या अनेक तज्ज्ञांनी आता सिद्ध केले आहे. ती गोष्ट या महामंत्रात सांगून क्रोध टाळण्याचा रास्त सल्ला दिला आहे. क्रोधाचा वेग सहन करावयाची सवय लागलेल्या प्रमाणात पुढे पुढे क्रोधाची निर्मिती मुळातच कमी होऊ लागेल आणि अर्थात त्यापासून होणारे दु:ख जाईल. प्राप्त दु:खाचे कारण कोणते याच्या शोधामागे भूतकाळात जावयाचे असेल त्याने जावे. अन्यथा या मंत्रशक्तीचा उपयोग करून घेऊन, वेग-संयमाचा हा उपाय अंमलात आणावा. दु:खाच्या वेळी शारीरिक दु:खातही शक्य तर ताठ बसून शांतपणाने या मंत्र शक्तीचा उपयोग करावा. आवाज हळू ठेवावा. कर्मशुद्धि केल्याने दु:खमुक्ति प्रक्रिया फुलासारखी हलकी होईल.

## १७. भक्तिसुखाच्या सौख्यासाठी

योगी युंजीत सततम् आत्मानं रहसि स्थित:
एकाकी यतचित्तात्मा निराशीर परिग्रह: ।। १० ।।
**–गीता ६–१०**

**अर्थशक्ति :** परमेश्वराला कोणत्या तऱ्हेची भक्ति आवडते याचे गीतेच्या बाराव्या अध्यायात वर्णन आहे. परमेश्वराच्या भक्तीचे स्वरूप आणि शास्त्र हा बाराव्या अध्यायाचा आत्मा आहे. तेथे भक्तीच्या अटी सांगितल्या आहेत. त्या भक्तीची योगमुक्त प्रक्रिया, सहाव्या अध्यायात सांगितली आहे आणि भक्तीसाठी योग्य व्यक्तिमत्व तयार करणारी पार्श्वभूमि आपल्याला सहाव्या अध्यायात मिळते. भक्तीची ही सुखमय साधना विनाकष्ट साध्य होणारी नाही. त्या साधनेचा खुलासा करताना दहाव्या श्लोकात भगवान म्हणतात, ''एकांतात राहून स्वत:चा चित्तात्मा ताब्यात ठेवून निरीच्छ किंवा अपरिग्रहीत राहून, सतत आत्मदर्शनसाठी युक्त रहावे.'' ही धारणा योगी साधकांसाठी आहे हे जितके खरे, तितके त्या साधनाने भक्तीसाठी आवश्यक मनोबल तयार होते हेहि खरे. ही गोष्ट बाराव्या अध्यायातील बारा ते वीस श्लोक पाहिले व त्यातील अटींची येथे तुलना केली तर समजू शकेल.

**वैज्ञानिक शक्ति** : नैसर्गिक 'अ'कारातील शक्ति सोडून सत्तावन्न वर्णमालेची शक्ति या श्लोकात आहे. त्यात पंधरा प्रखर शक्तीचे, अठरा सौम्य शक्तीचे आणि चोवीस मध्यम शक्तीचे प्रेरक आहेत, म्हणजे एकूण मध्यम शक्ति प्रेरणा येथे अधिकतम आहे.

**उपयोग :** या मंत्रातील शक्ति योगसाधना करण्यास उपयोगी आहे. भीक्त करताना जे सुख होते त्यांचा अनुभव या साधनेत आणि पूर्व तयारीच्या स्थितीत प्रकर्षाने मिळेल. स्वत: कठोर व्रते जमत नाहीत अशांनी, अशी व्रते करणाऱ्या तपोनिधीचे चित्र पुढे ठेवून, त्यांचा आदर करून, भक्तिमार्गाची वाटचाल सुरू करावी. हणूहळू आपणहि प्रत्यक्ष शक्य ती साधना करावी. सव्रत शुद्ध साधनेने भक्तीचा एक अपूर्व आनंद प्राप्त होईल.

## १८. भक्तीचे ज्ञान होण्यासाठी ज्ञानाची भक्ति

**तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिजर्विशिष्ये ।**
**प्रियो हि ज्ञानिनोडत्यर्थमहं स च मम प्रिय: ।।१७।।**
**– गीता ७–१७**

**अर्थशक्ति :** चार प्रकारचे लोक कृष्णाच्या भक्तीला उद्युक्त आहेत, असे भगवान कृष्णांनी सातव्या अध्यायात सोळाव्या श्लोकात म्हटले आहे. ते चार प्रकारचे लोक म्हणजे दु:खमुक्ति इच्छिणारे, अर्थार्थी, जिज्ञासू आणि ज्ञानी. हे चार प्रकार सांगितल्यावर या सतराव्या श्लोकता भगवान कृष्ण त्यातील उत्तम प्रकारच्या भक्ताचा उल्लेख करतात. भगवान म्हणतात, ''त्यापैकी ज्ञानी मात्र माझेवर नित्य निष्ठा ठेवतो कारण माझी भक्ति करणे विशंष हितकर आहे. खात्रीने ज्ञानवंतास मी अतिशय प्रिय आहे. आणि तो मला प्रिय आहे.''

**वैज्ञानिक शक्ति :** नैसर्गिक 'अ'वर्ण सोडून या श्लोकात एकूण पासष्ठ वर्णशक्ति समाविष्ट आहेत. त्यात तीव्र आणि मध्यम शक्ति

जवणजवळ समप्रमाणात आहेत. एकूण पासष्ट वर्णशक्तीमध्ये प्रखर शक्तियुक्त तेवीस व सौम्य शक्तियुक्त वीस अशी वाटणी आहे.

**उपयोग:** शक्ति ही अत्यंत श्रेष्ठ अवस्था आहे. भक्ति म्हणजे नि:शंक संपूर्ण समर्पण. हे समर्पण एकाएकी करता येणे व्यवहारात अशक्य आहे. तरी कोणी ते करू म्हणेल तर त्यात चुकीचे काही नाही. अंधभक्ति ही श्रेष्ठ असते, पण सामान्य मनुष्य अंधभक्तीचे नाव सांगून अर्धभक्तीचे गांव गाठण्याचा अर्धवटपणा करतो. तो त्याला हितकारक नव्हे, पायरी पायरीने निश्चय दृढ करीत, ज्ञान घेत भक्तीचे परम शिखर गाठणे अधिक व्यवहारशक्य असते. म्हणून भगवान कृष्ण स्वत:च्या माध्यमातून भक्ताला ती दृढता आणण्याची प्रेरणा देत आहेत. ती प्रेरणा घेऊ इच्छिणाल्या साधकाला या मंत्रस्थानात खूपच लाभ मिळेल. हा मंत्र नियमित पूजा झाल्यावर किमान अठरा वेळा म्हणावा. योग्य ते व्रत घ्यावे. हळूहळू भक्तिसुखाचा विशेष अनुभव येऊ लागेल.

## १९. ॐकाराचा चमत्कार

**ॐ इत्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन् ।**
**य: प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम् ।।**
**–गीता ८–१३**

**अर्थशक्ति :** आठव्या अध्यायाच्या ११व्या श्लोकात भगवान कृष्ण परमशक्तीच्या प्राप्तीचा उपाय अर्जुनाला सांगावयास लागतात. बाराव्या श्लोकात परमशक्तीशी एकरूप होण्यासाठी अखेरीस जे आसन

घ्यावे लागते त्याचे विवेचन केले आहे आणि तेराव्या श्लोकात उच्चार सांगितला आहे. सारांशाने तेथे भगवान म्हणतात, ''ॐ या एका अक्षराने सुचवलेले जो ब्रम्ह त्याचे उच्चारण करीत व माझे स्मरण करीत जो देह ठेवतो तो परमश्रेष्ठ अशा गतीला जातो.''

**वैज्ञानिक शक्ति :** नैसर्गिक असे अकरा 'अ'कार सोडून एकसष्ट वर्णशक्तींनी बांधलेला हा श्लोक आहे. त्यात मध्यम शक्तिप्राबल्य आहे. त्यापैकी लघुलहर तरंग शक्तियुक्त एकोणीस, सौम्यशक्तियुक्त सोळा आणि मध्यमशक्तियुक्त असे सव्वीस वर्ण आहेत, म्हणजे सर्वसाधारण मध्यम शक्तीचेच प्राबल्य राहील.

**उपयोग :** परमशक्तीशी एकरूप करण्याची क्रिया, प्रक्रिया आणि उच्चार येथे सांगितला आहे. ॐकाराचे सामर्थ्य परमशक्ति-समांतर आहे. वेदकाळापासून ॐकार हा श्रेष्ठ शक्तींचे रूप मानला गेलेला आहे. बौद्ध, जैन, शीख धर्मातील कित्येक विचारवंत ॐकारशक्ति मानतात. ॐमध्ये ब्रम्हा, विष्णु, महेश यांच्या शक्ति एकत्रित झाल्याचेहि मानतात. ज्ञानेश्वर महाराजांनी ॐला गणेशरूप केले आहे, असे ज्ञानेश्वर अध्याय एक, ओवी एकोणीस वरून दिसते. ॐकार शक्तीचे वर्णन छांदोग्य उपनिषदात, प्रश्नोपनिषदात, मांडुक्योपनिषदात आणि अनेक प्राचीन ग्रंथात केले आहे. ॐ ज्या वर्णशक्तीने बांधला आहे. त्यापैकी काहीवर अमेरिकेच्या लॅसॅरिओने प्रयोग केले व त्यातील शक्ति सिद्ध केली. ॐ हा शांतिदायक, शक्तिदायक आहे. कर्म शुद्धिव्रत योग्य तऱ्हेने घेऊन साधारणत: अनेक इच्छा ॐकाराने पूर्ण होतील.

## २०. मोक्षाची तयारी करण्यासाठी

ते तं भुक्त्वा स्वर्ग लोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्य लोकं विशन्ति ।
एवं त्रयीधर्ममनुप्रपन्नो गतागतं कामकाम लभन्ते ।।२१।।
**–गीता ९–२१**

**अर्थशक्ति :** अनेकांची अशी समजूत आहे की, स्वर्गसुख म्हणजे चिरकाल टिकणारे सुख, परंतु तसा अर्थ नाही. विविध धर्मांनी स्वर्गाच्या विविध व्याख्या केल्या असल्या तरी काही धर्मानी सात स्वर्गाची कल्पना मानली आहे. त्यात हिंदु धर्माचा समावेश होतो. सात प्रकारचा स्वर्ग कल्पनात विविध कमीजास्तपणा ओघानेच आला, आणि खुद्द संकुल स्वर्ग कल्पनेत तौलनिक क्षणभंगुरता कायम राहिली. भगवान कृष्ण नवव्या अध्यायात तेराव्या श्लोकात ते वेदाज्ञेप्रमाणे कर्मे करणाऱ्यांना मिळणारी फळे सांगतात, पुढे सारांशाने बजावतात, पण ''ते ते लोक त्या स्वर्गसुखाचा बराच अनुभच घेऊन पुण्य उपभोगून झाल्यावर पुन्हा मृत्युलोकांवर दाखल होतात. याप्रमाणे वेदाने सांगितलेली कर्मे करणारे व आचरण करणारे जन्म–मरणाची यातायात करीत राहतात. ती त्यांना सुटत नाही.''

**वैज्ञानिक शक्ति :** नैसर्गिक 'अ'कार सोडून येथे एकूण पंच्याऐंशी वर्णाची शक्ति आहे. त्यात एकवीस प्रखर शक्तीचे, तेवीस सौम्य शक्तीचे व उरलेले एक्केचाळीस मध्यम शक्तीचे आहेत. सारांश यात प्राबल्य मध्यम शक्तीचेच आहे.

**उपयोग :** वेदोक्त कर्मे केल्यावर आणि स्वर्ग मिळवल्यावरसुद्धा

स्वर्ग सोडून पुन्हा कष्टप्रद स्थिती प्राप्त होते. हे येथे स्पष्ट सांगण्याचा हेतु इतकाच दिसतो की, स्वर्गाच्या मोहात ज्ञात्याने पडू नये, याचाच अर्थ या मंत्रोपदेशाने मोक्षासाठी मानसिक तयारी होते. स्वर्ग हा क्षणभंगूर ठरल्यावर आणि त्या मार्गाची चंचलता मनावर ठसल्यावर मोक्षप्रेरणाच मिळणार. सारांश, छोट्या सुखात मन गुंतून राहू नये, म्हणून या श्लोकातील मंत्रशक्ति अत्यंत उपयोगी पडेल. नेहमीची पाठ्यपूजा केल्यावर शांतपणे हा मंत्र अकरा वेळा म्हणावा, योग्य व्रत घेण्यास विसरू नये, मोक्षाची तयारी खात्रीने सुलभ होईल.

## २१. भक्ति–तपाने सुख मिळवण्यास

मच्चिता मद् गतप्राणा बोधयंत: परस्परम् ।
कथयंतश्च मां नित्यं । तुष्यंति च रमंति च ।।
–गीता १०–९

**अर्थशक्ति:** भक्तीमध्ये मूलत: समर्पणाची क्रिया अभिप्रेत असली पाहिजे. संपूर्ण समर्पण होण्यास सुद्धा हे तत्वत: कठीण असते. अशा परिस्थितीत या समर्पणावस्थेकडे मनाला नेण्यासाठी त्याची तयारी कशा रीतीने करता येईल असा विचार पुष्कळदा साधकांना अस्वस्थ करतो. भगवंतानी या अस्वस्थतेवर या श्लोकात इलहज सांगितला आहे. त्यांच्या सांगण्याचा भावार्थ असा, ''माझ्या ठिकाणी चित्त ठेवू आणि माझ्या ठिकाणी चित्त, जीवप्राण लावून एकमेकांना उपदेश करीत आणिा माझ्याबद्दलच्या गोष्टी सांगत ते (ज्ञानी) संतुष्ट असतात. त्यातच ते रमतात.'' ज्ञानी साधक

स्वयं संतुष्ट नसतो म्हणून त्याला चर्चा आवश्यक असते. या मर्यादेपर्यंत ज्ञानातून भक्तीची युक्ति या श्लोकार्धात सूचित होते.

**वैज्ञानिक शक्ति :** नैसर्गिक 'अ'काराची शक्ति सोडून एकूण एक्कावन्न वर्ण शक्तींनी हा श्लोक बांधला आहे. त्यांत बारा तीव्र शक्तीचे, एकतीस मध्यम शक्तीचे, आणि आठ सौम्य शक्ति–प्रेरित वर्ण आहेत. एकूण येथे, मध्यम शक्तिप्रभाव स्पष्ट दिसतो.

**उपयोग :** ज्ञानातून भक्ति फुलते. ती हळूहळू आणि पायरी पायरीने विकसित होते. हा विकास अधिक जलद करण्यासाठी भगवान कृष्णांनी या श्लोकात स्वत:चे माध्यम वापरण्याची सूचना येथे केली आहे. भगवंताच्या गुणांचे ज्ञान त्याची चर्चा, त्यात घातलेला वेळ या सर्वांची परिणति समर्पण दृढ होण्यासाठी होणार हे उघड आहे. या सर्व प्रक्रियेची प्रेरणा आणि स्पष्टता या मंत्रात केली आहे. या मननाने, साधनेवर चित्त अधिक दृढ होईल.

## २२. कृष्णदर्शनाची सूक्ष्म यूक्ति

कालोऽस्मि लोकक्षय कृत्प्रवृद्धो लोकान्समाहर्तुमिह प्रवृत:।
ऋतेऽपि त्वां न भविष्यंति सर्वे येऽवस्थिता: प्रत्यनीकेषु योधा:।।
**–गीता ११–३२**

**अर्थशक्ति :** अर्जुनाला कृष्णाचे मूळ स्वरूपात दर्शन हवे होते. ते दर्शन अर्जुनाला ज्या युक्तीने मिळाले ती युक्ति काही प्रमाणात इतरांना

उपयोगी पडेल. कृष्णांचे भयानक रूप हेच सत्य असेल, तर तो भयानकपणा भावी काळात आपल्याला भासू न देण्याची कोशीस प्रत्येकाने केली पाहिजे. खोट्या सबबी ऐकल्या जाणार नाहीत, ही खात्री अकराव्या अध्यायात कृष्णाने स्पष्टपणाने दिली आहे. सुरूवातीच्या बत्तिसाव्या श्लोकात कृष्ण स्वरूप सांगतो, त्याचा भावार्थ असा, ''मी लोकांचा अंत करणारा आणि लोकांचा क्षय करण्यासाठी महारूप धारण केलेला असा 'काळ' आहे आणि या सर्व लोकांचा संहार करण्याची माझी प्रवृत्ति आहे. म्हणून तू काही न करतासुद्धा समोरचे सर्व योद्धे नाहीसे होणार आहेतच.''

**वैज्ञानिक शक्ति :** नैसर्गिक 'अ  मधील शक्ति सोडून इतर नव्याण्णव वर्णांनी ही मंत्रशक्ति बांधली आहे आणि त्यात बरोबर प्रखर शक्तीचेच प्राबल्य आहे. नव्याण्णवपैकी सौम्य शक्तीचे तीस, मध्यम शक्तीचे बत्तीस व प्रखर शक्तीचे सदतीस म्हणजे सर्वाधिक आहेत.

**उपयोग :** सत्य लपवून काही तरी खोट्या समजुतीने सौम्य कृष्ण–दर्शन पदरात पाडून घेण्याची इच्छा चुकीची आहे. अप्रिय असले तरी सत्य हेच हितकर असते. कृष्णाची कठोरता ही न्यायधिष्ठित असणार हे उघड आहे. अशा परिस्थितीत मूळ स्वरूपातील कृष्णदर्शनाची इच्छा करणाऱ्याने कठोर व्रते पत्करण्याचे धैर्य धरावे, लोकहिताची कामे देवाला आवडतात असे समजावे आणि मग कृष्ण दर्शनाची इच्छा बाळगावी. या सर्व सत्याची समज देणारा हा उत्तम समज देणारा हा उत्तम श्लोकमंत्र आहे. योग्य व्रताने पूजापाट झाल्यावर किमान अठरा वेळा म्हणावा. म्हणजे कृष्णदर्शन होईलच होईल.

## २३. भक्तीच्या अटी समजावून घेण्यासाठी

तुल्यनिंदास्तुतिर्मोनी संतुष्टोयेनकेनचित् ।।
अनिकेत: स्थिरमर्मक्तिमान्मे प्रियोनर: ।।
**–गीता १२–१९**

**अर्थशक्ति :** भक्तीच्या अनेक अटी आहेत. बाराव्या अध्यायाच्या बाराव्या श्लोकापासून विसाव्या श्लोकापर्यंत भगवान कृष्ण, त्यांना आवडणाऱ्या भक्तांचे वर्णन किंवा अटी सांगत आहेत. त्यापैकी हा एकोणिसाव्या श्लोक भक्ताच्या एकचित्ततेसाठी अर्थगर्भ आहे. देवाकडे माणसाचे एकचित्त होत नाही. याचे कारण संसारात मानापमान, माया, सुखदु:ख या आठवणीने तो गुंतलेला असतो. या आठवणींतून भक्त बाहेर निघू शकला तरच त्याची भक्ति शुद्ध होऊ शकेल. ही गोष्ट ठसविताना भगवान कृष्ण अर्जुनाला सांगतात, निंदा अथवा स्तुति एकच मानणारा, मोजके भाषण करणारा, मिळेल त्यात संतुष्ट होणारा, गृहहीन, मन व बुद्धि शांत ठेवणारा पुरूष मला आवडतो. येथे अनिकेत म्हणजे गृहहीन. हा शब्द किमान घराच्या ओढीने त्याला चिकटवून न बसणारा एवढा तरी घ्यावयास हवा.

**वैज्ञानिक शक्ति** : नैसर्गिक ‘अ’कारातील शक्ति सोडून येथे सदुसष्ट वर्ण आहेत. या वर्णशक्तीत मध्यम शक्तीचे प्राबल्य आहे. कारण समभाव आणि स्थिरभाव यावर येथे जोर आहे. प्रखर शक्तीचे सोळा वर्ण, सौम्य शक्ति वीस व मध्यम शक्ति एकतीस अशी वर्णाची वाटणी आहे.

**उपयोग :** भक्तीचे माहात्म मोठे आहे. भक्तीचे उपयोग अवर्णनीय आहेत. पण भक्तीच्या अटी या कडक आहेत. हा कडकपणा अंगिकारलेल्या कडक व्रतांनी नरम करणे हे सद्‌भक्ताचे काम आहे. ते काम त्याने केले म्हणजे तो भक्त देवाला प्रिय होतो. त्याला, तो मागेल ते मिळते. त्यासाठी आवश्यक ती पातळी गाठण्याची सुरवात या मंत्राच्या उच्चाराने होईल. सकाळ-संध्याकाळ योग्य व्रते घेऊन किमान पाच वेळा म्हणावा. देवकृपेचा प्रत्यय येईल.

## २४. स्थावर-जंगम मिळकतीच्या यशास

यावत्संजाये किंचित सत्त्वं स्थावरजंगमम् ।
क्षेत्रक्षेत्रज्ञसंयागात्तिद्विद्धि भरतवर्षभ ।।
**-गीता, १३-२६**

**अर्थशक्ति :** स्थावर-जंगम मिळकत माणसाने मिळविण्याचा मंत्र समजण्यापूर्वी, अशी मिळकत मिळण्याची जी 'पद्धत' निसर्गात दिसते, ती गीतेच्या वरील श्लोकात ग्रंथित केली आहे. भगवान कृष्ण सांगतात त्याचा भावार्थ असा, ''जे काही स्थावरजंगमात्मक उत्पन्न होते ते क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या संयोगाने.'' येथे शब्दश: अर्थ प्राणिमात्रापुरता करतात, पण सूक्ष्म अर्थाने यात सर्वसामान्य स्थावर-जंगमाचा समावेश करावयास हरकत नाही. कारण इतर स्थावर जंगम मिळकत मिळवितांना देहांतर्गत क्षेत्र-क्षेत्रज्ञ संयोग आवश्यक आहे.

**वैज्ञानिक शक्ति :** नैसर्गिक सोळा 'अ'कार सोडून या श्लोकात एकसष्ट वर्ण आहेत. त्यात मध्यम शक्तीचे प्राबल्य आहे. वीस प्रखर शक्तियुक्त, बारा मृदु आणि एकोणतीस मध्यमशक्तीने बांधलेले आहेत.

**उपयोग** : श्लोकांचा अर्थ लक्षात घेतला, तर येथे एक प्रकारे एक स्पष्ट जाणीव दिली आहे. जड आणि अजड यांच्या संयोगाने सृष्टि उत्पन्न होते, यात जड निर्लेप असल्याने शक्तिव्यय अजडाचा होणार ही गोष्ट लक्षात घेऊन एका बाजूने संयम शिकवीत, दुसऱ्या बाजूने महत्वाकांक्षी माणसास हा श्लोकमंत्र मार्गदर्शक होतो.

## २५. गैरसावधपणाचे धोके टाळण्यास

सत्त्वं रजस्तम इति गुणा: प्रकृतिसंभवा: ।
निबध्नन्ति महाबाहो देहे देहिनमव्ययम् ।।

**–गीता, १४–५**

**अर्थशक्ति :** याच अध्यायाच्या नवव्या श्लोकात भगवान म्हणतात की, सत्त्वगुण सुखाच्या ठायी, रजोगुण कर्माच्या ठायी, प्रेम उत्पन्न करतो. पण तमोगुण हा कर्तव्याचा विसर पडावा या गोष्टींचीच आसक्ति उत्पन्न करतो. ही तीन चित्रे नवव्या श्लोकाने स्पष्ट केली आहेत आणि तेविसाव्या व पंचविसाव्या श्लोकात गुणातीत अवस्थेची थोरवी सांगितली आहे. या सर्वांच्या अलीकडे म्हणजे या पाचव्या श्लोकात भगवान कृष्ण सर्व धोक्याच्या मूळ स्वरूपांचे वर्णन करतात. त्याचा भावार्थ असा, 'सत्त्व,

रज, तम हे प्रकृतीपासून निर्माण झालेले गुण आहेत. ते गुण पंचभूतात्मक देहात राहणाऱ्या अव्यय म्हणजे निर्विकार आत्म्याला बांधून टाकतात.

**वैज्ञानिक शक्ति :** नैसर्गिक बारा 'अ'कार सोडून या मंत्रश्लोकातील शक्ति एकूण एकसष्ट वर्णांनी बांधली आहे. त्यात मध्यम शक्तिचे प्राबल्य आहे. अठरा लघु-तरंग*शक्तीचे, सोळा दीर्घ लहर तरंग शक्तीचे व सत्तावीस मध्यमलहरतरंग-शक्तीचे अशी वाटणी आहे.

**उपयोग :** कोणताहि अपराध केला असतांना आणि कधी कधी त्या वेळेला अपराध केलेला नसतांनासुद्धा आजूबाजूला गैरसमज पसरतात. त्यामुळे संबंधित मनुष्य नाराज होता, चिडतो, अस्वस्थ होतो. अशा वेळी त्याला धीर देणारे ज्ञान या मंत्रात आहे. प्रत्येक जण आपापल्या कर्मबंधनातून निर्माणा होता आणि त्यातून एखादी नावडणारी स्थिती उत्पन्न होते. यांचे संबंध जाणून ही परिस्थिती सुधारू शकेल. आत्म्यासारखी पवित्र वस्तु शरीरात आदर्श म्हणून स्थित असतांना त्रिगुणात्मक बंधनाच्या परिपाकाला भिण्याचे कारण काय? ही गोष्ट मनावर ठसवणारा आणि गैरसमजापासून सोडवणारा हा महामंत्र आहे. रोजच्या साधनेनंतर हा अकरा वेळा म्हणावा व योग्य व्रत घ्यावे.

## २६. अस्पृश्य उद्धाराचा महान् मंत्र

**सर्वस्य चाहं हृदि संनिविष्टो । मत्त:स्मृतिर्ज्ञानमपोहनं च ।।**
**वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो । वेदान्तकृद्वेद विदेव चाहम् ।।**

**–गीता, १५–१५**

**अर्थशक्ति :** समाजात मानवजातीत कृष्णाने महान स्थान मिळविले आहे. हे स्थानत्याने सर्वच चराचरामध्ये मिळविले आहे असे सांगणारा हा महामंत्र आहे. कृष्णाची परमशक्ति मानवजातीत नव्हे तर सर्वांच्या हृदयात वास करीत आहे. ही गोष्ट कृष्णाने दहाव्या अध्यायात एकोणिसाव्या श्लोकात अधिक स्पष्ट सांगितली आहे. ही गोष्ट या पंधराव्या अध्यायात पुन्हा भगवान सांगतात, त्याचा भावार्थ असा: ''मी सर्वांच्या हृदयात निवास करीत असून माझ्यापासून माणसाला स्मृति, ज्ञान, विचार प्राप्त होतात. सर्व वेदांच्या योगाने मीच जाणला जाण्यास योग्य आहे व मी वेदवेत्ता, वेदांतकर्ता व मार्गदर्शक मीच आहे.

**वैज्ञानिक शक्ति :** नैसर्गिक 'अ'कार सोडले तर या श्लोकातील शक्ति एकूण ब्याऐंशी वर्णशक्तीने बांधली आहे. त्यात तीव्र शक्तीचे प्राबल्य आहे. आणि ते योग्यच आहे. एकूण वर्णापैकी तीस मध्यम शक्तीचे, वीस सौम्य शक्तीचे आणि बत्तीस तीव्र शक्तीचे म्हणजे लघु-तरंग शक्तीचे आहेत.

**उपयोग :** चातुर्वर्ण्याचा कर्ता म्हणून कृष्णावर क्वचित् टीका होते. चातुर्वण्य पद्धति कृष्णाने निर्माण केली, असे धरून चालू. पण रामजन्मात आदिवासी शबरीची बोरे खाणारा, कृष्णजन्मात गवळ्यांत खेळणारा, विदुराच्या कण्या खाणारा, गोवर्धन पर्वत उचलण्याचे श्रेय सहकार्यांच्या काठ्यांना देणारा कृष्ण, एखाद्या समाजावर कायम अन्याय कसा करील ? काही तात्कालिक गरजेसाठी त्याने निर्माण केलेल्या वस्तु, त्यानेच स्वत:च नष्ट केल्याचा पुरावा सहजच सापडू शकेल. स्वत:चे पुत्र-पौत्र स्वत:च्या

हाताने नाश केले. द्वारकानगरी स्वत: बुडवण्यास कारणीभूत झाला. त्या व्यक्ति आणि संस्था कृष्णाच्याच होत्या ना? एखाद्या तथाकथित अस्पृश्याच्या मनात अन्यायाविरूद्ध बंड करण्याचा विचार आला तर त्याला बंडाचे ज्ञान कृष्णच देऊ शकेल. असे निदान कृष्णाला मानणाऱ्या उच्च वर्णीयांनी तरी समजले पाहिजे. कारण या श्लोकामध्ये 'स्मृति,ज्ञान व विचार' या कृष्णप्रेरणेत म्हटले आहे. याच दृष्टीने आद्य शंकराचार्यांनी एका ज्ञानी व विचारवंत चांडाळाला आपला गुरू केला. वेदकर्ता कृष्ण होता, असे तिसरी, चौथी ओळ सांगते. तेव्हा अस्पृश्यता कृष्णाला प्रतिपादावयाची असती तर वेदात तरी त्याने लिहिले असते. गीतेपर्यंत तो थांबला नसता. तथाकथित अस्पृश्याबद्दल तिरस्कार बाळगणाऱ्यांनी हा महामंत्र जपावा आणि तथाकथित अस्पृश्यांनी या मंत्राच्या साहाय्याने आपल्यातील कृष्ण पाहावा. आत्शांति व आत्विश्वास देणारा हा श्लोक रोज सकाळ-संध्याकाळ एकवीस वेळा म्हणावा व यथायोग्य व्रत घ्यावे.

## २७. श्रीमंतांचा नरक कसा टळेल?

अनेकचित्त विभ्रांता । मोहजाल सामावृत्तः ।।
प्रसक्ताः कामभोगेषु । पतन्ति नरकेऽशुचौ ।।
**-गीता, १६-१६**

**अर्थ शक्ति :** सोळाव्या अध्यायाच्या तिसऱ्या, तेराव्या व सोळाव्या श्लोकात एक सूत्र जोडता येते. तिसऱ्या श्लोकात ज्ञानाची लक्षणे आहेत. तेराव्या श्लोकात ज्ञान सोडून आशेच्या मागे लागणाऱ्या लोकांचे वर्णन आहे आणि सोळाव्या श्लोकात अशा पापबद्ध कर्माची मरणानंतर

होणारी स्थिती वर्णन केली आहे. अशा लोकांना नरकच मिळतो. भगवान् कृष्ण धनोन्मादाने उन्मत्त झालेल्या असुरांबद्दल, सुखप्यासी जनांबद्दल म्हणतात, त्याचा भावार्थ असा: अनेक कल्पनांनी भ्रमिष्ट झालेले, मोहाच्या जाळ्यात सापडलेले हे भोगमग्न जन अखेर घोर नरकांत जातात.

**वैज्ञानिक शक्ति :** नैसर्गिक 'अ'कार सोडून हा श्लोकमंत्र एकूण ६० वर्णांच्या शक्तींनी बांधला आहे. त्यात मध्यम शक्तीचे प्राबल्य आहे. प्रखर शक्तियुक्त पंधरा, मध्यम शक्तीचे पंचवीस व सौम्य शक्तीचे वीस वर्ण असे प्रमाण आहे.

**उपयोग :** सोळाव्या अध्यायाच्या पंधराव्या श्लोकामध्ये, दान करून देवाला जिंकू पाहणाऱ्याला इशारा आहे. (तसा तो अनुगीतेतहि आहे.) तोच इशारा सोळाव्या श्लोकात पुढे चालवला आहे. त्याचे मनन, चिंतन साधकाला जागृत ठेवील. त्यात इष्ट परिवर्तन घडवून आणील. धनवानांचा चित्तपालट होऊन त्याचे चित्र शुद्ध झाले की कृती पालटेल व मिळालेले धन बाधणार नाही. साहजिक त्या धनिकाचा नर्क टळेल. निष्ठेने हा मंत्र एकावन्न वेळा रोजच्या प्रमार्थना कामानंतर उच्चारावा. त्यानंतर मिनिटभर थोबून 'हरि ॐ तत् सत् ब्रह्मार्पणमस्तु' त्रिवार म्हणावे. योग्य व्रत घ्यावे. शांतिप्रत्यय येईल.

## २८. समाजसेवेच्या यशासाठी

**ॐ तत्सदिति निर्देशो ब्रम्हणस्त्रिविध: स्मृत: ।**
**ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिता: पुरा ।**

**–गीता, १७–२३**

**अर्थशक्ति :** ओंकाराचा उल्लेख गीतेत स्पष्टपणे असलेले हे एक महत्वाचे स्थळ आहे. कारण येथे ॐकाराबरोबर इतर व्यवहारपयोगी सूचना आहेत. त्या 'तत् सत्' ने दिल्या आहेत. ओम तत्चा उपयोग ब्रम्हपद प्राप्त करून देण्यास समर्थ आहे असा या श्लोकाच्या पूर्वाधाचा भावार्थ आहे. खालच्या पंक्तीतील ब्राम्हणादिकांचे उल्लेख या मंत्राचे सामर्थ्य व पुरातनता दाखविण्यापुरते आहेत. ब्राम्हण हे ब्रम्ह जाणणारे या अर्थाने येथे अभिप्रत असावयास हवेत. उच्चपणा दाखवण्याच्या अर्थाने 'ब्राम्हण' हा उल्लेख परस्पर विरोधाचे उदाहरण म्हणून करावे लागेल. ब्रम्हात 'समानता' आहे. मग त्याला जाणणारा उच्चनीचतेच्या गोष्टी कशा बोलू शकणार ? उलट पंचविसाव्या श्लोकात तत् म्हणून फलत्यागपूर्ण कर्माचा व सव्विसाव्या श्लोकात 'सत्'ची फेड साधुभाव (व अस्तित्त्व) अशी केली आहे. उच्चनीचपणाचा अभिप्राय येथे असू शकणार नाही.

**वैज्ञानिक शक्ति :** एकोणसत्तर वर्णांपैकी प्रखर सव्वीस, मध्यम तेवीस, सौम्य वीस आहेत.

**उपयोग :** मोक्षसाधकाला मोक्ष साधून घेण्याची युक्ति हा मंत्र सांगतो पण ते करताना आपातत: त्या साधकाकरवी परोपकार घडतो व त्याला कीर्तिमान करतो.

## २९. देवाच्या उच्चतम कृपेसाठी

नष्टो मोह: स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाच्युत ।
स्थितोऽस्मि गतसंदेह: करिष्ये वचनं तव ।।

**–गीता, १८–७३**

**अर्थशक्ति :** भक्ति म्हणजे नि:संदेह निष्कर्षाने प्राप्त झालेली अवस्था आहे. परमेश्वरावर विश्वास ठेवतो असे सांगणारे भक्त संसारात चिंतातूर झाल्याचे दृश्य आपल्या डोळ्यांपुढे सदाचेच असते. नुसता परमेश्वर आहे अशी कल्पना करणारे अस्तित्ववादी याप्रमाणे वागतात यात मोठेसे नवल नाही. परंतु साक्षात् भगवान कृष्ण समोर उभे ठाकले असताना अर्जुनाला भक्तीची नि:संदेह अवस्था तात्पुरती का होईना) येण्यासाठी किती तरी काळ हे कष्ट करावे लागले. यावरून भक्तीचा अवघडपणा लक्षात येईल. पहिल्या अध्यायानंतर दुसऱ्या अध्यायात कृष्णाने सूत्ररूप उत्तर दिले. पण अर्जुनाच्या शंकेची चवड वाढतच होती. अकराव्या अध्यायात साक्षात् परमेश्वराचे मूळ रूपांत दर्शन झाल्यावरहि अर्जुनाचे प्रश्न संपले नव्हते. त्यानंतर आणखी पाच अध्याय प्रश्नोत्तराची झड चालूच राहिली अठराव्या अध्यायाच्या अखेरीलासुद्धा, म्हणजे ७३व्या श्लोकात अर्जुनाने प्रश्नाचे सत्र आणि सरबत्ती संपवली. तो म्हणाला, ‘‘हे कृष्णा, तुझ्या कृपेने माझा मोह नाहीसा झाला. चांगली स्मृति मिळाली. मी नि:संदेह झालो. आता तुझ्या उपदेशाप्रमाणे मी करीन.’’

**वैज्ञानिक शक्ति :** नैसर्गिक ‘अ’अकार सोडले तर एकूण पासष्ट वर्णांनी ही मंत्रशक्ति बांधली आहे. त्यात मध्यमशक्तीचे प्राबल्य आहे. एकूण मंत्रशक्तीत चोवीस लघु-लहर-तरंग-शक्तीचे व चौदा दीर्घ-लहर-तरंग-शक्तीचे असे आहेत.

**उपयोग :** भक्तीची अवस्था प्राप्त होईल असे क्षण दुष्प्राप्य आहेत. पण असे क्षण कोणाच्या अनुभवाला आले तर ते त्याने घट्ट पकडून

ठेवले पाहिजेत. ज्यांना हा अनुभव येश्रन गेला नसेल त्यांनी अर्जुनाच्या या क्षणातील स्थितीशी समरस व्हावे, म्हणजे बीजरूपाने त्यांना ती अवस्था मिळण्याची शक्यता आहे. नेहमीच्या साधनेनंतर वरील श्लोकमंत्र किमान एकवीस वेळा संपूर्ण निरहंकारी वृत्ति चेतवून उच्चारला पाहिजे. अर्थात् मनातल्यामनात उच्चारण्यास हरकत नाही. योग्य व्रताने ही अवस्था लवकर येईल आणि भक्तीचे फलित अधिक त्वरेने मिळण्याची शक्यता निर्माण होईल.

## ३०. वैराचे दुष्परिणाम टाळण्यासाठी

**यच्च यत्र च वक्तव्यं तद् वक्ष्यामि जनार्दन ।**
**तव प्रसादद्धि शुभा । मनो मे बुद्धिराविशत् ।।**

**अर्थशक्ति :** इतिहासकाळातले पुराण काळातले अनेक प्रसंगच मंत्राचे काम करतात. कारण मंत्रात प्रमुख युक्ति मननाची आहे. त्याप्रसंगाचे शब्दांकित रूप मंत्रासारखे पुण्यवान असते. महाभारतकाळातील दुष्टतेलाहि सोनेरी कडा दिसतात. मग सृष्टीची पातळी किती उंच असेल? कौरव पांडवांच्या वैरांत भीष्म हा कौरवांचा पहिला सेनापति होता, तर कृष्ण म्हणजे पांडवांची सामर्थ्यशीला होती. म्हणजे वैराच्या दोन्ही टोकावर कृष्ण व भीष्म उभे होते. पण त्यांचे वैर नव्हते. असलेच तर ते मर्यादित काळापर्यंत होते, असे सूक्ष्म पाहण्याची सवय नसणाऱ्या माणसाच्या दृष्टीने म्हणावे लागेल. विरूद्ध बाजूचा नायनाट व्हावा म्हणून धडपडणारे श्रेष्ठी निर्वैर कसे राहू शकतील असा प्रश्न आजच्या वाचकांना सहज उद्‌भवेल. हा प्रश्न

विचाराची, बुद्धीची उच्च पातळी निर्माण करून घेतल्याशिवाय सुटणार नाही. मतभेदातील विष काढून टाकता येत नसेल तेव्हा भीष्माचे महाभारतातील वर्तन आठवावे. कृष्णाच्या युक्तीने, ज्ञानाने, प्रेरणेने भीष्माचा पराभव झाला. पण मृत्युशय्येवर भीष्मांना आठवण झाली ती कृष्णाची आणि भीष्माला त्या अवस्थेत प्रश्न विचारू शकेल असा दुसरा अधिकारी पुरूष कृष्णाशिवाय नव्हता. असे बाराव्या श्लोकात स्पष्ट होते. त्यावर सोळाव्या श्लोकात कृष्णाने भीष्माच्या प्रकृतीची चौकशी केली. भीष्माने सांगितले की, ''तुझ्याच कृपेने मी दुःख सहन करतो आहे.'' या बाविसाव्या श्लोकात भीष्म म्हणाला, त्याचा भावार्थ असा– ''ज्या विषयांत जे सांगण्याजोगे योग्य असेल ते मी सर्व सांगेन. तुझ्या कृपेने माझ्या हृदयात निर्मल मन आणि सद्बुद्धि याचा प्रादुर्भाव झाला आहे.''

**वैज्ञानिक शक्ति:** नैसर्गिक 'अ'कार सोडले तर एकूण अठ्ठावन्न वर्णानी या मंत्राची शक्ति बांधली आहे. त्यात सतरा प्रखर शक्तीचे, सत्तावीस मध्यम शक्तीचे व चौदा सौम्य शक्तीचे आहेत.

**उपयोग :** वैर हा एक डोक्यावरचा बोजा असतो. पुष्कळदा दोन्ही वैऱ्यांना वैर संपवावे असे वाटते. पण ते कसे संपवावे हे समजत नाही. तशी स्वाबाविक परिस्थिती प्राप्त होऊन जीवनातील गुंता सुटण्यास या श्लोकातील मंत्रशक्तीचा उपयोग होईल. रात्री झोपण्यापूर्वी शांत स्वरात किमान पाच वेळा हा श्लोक म्हणावा. अर्थात् योग्य व्रत घ्यावे.

## ३१. कुटुंब कलह टाळण्यासाठी

अनाथवद् विज्ञातो लोकेध्वनाजभलक्षित: ।
कुस्तितशनाम्युपायेन निधनं समवाप्स्यसि ।।
**–महा.स्त्रीपर्व, २५–४५**

**अर्थशक्ति** : व्यक्ति किंवा कुटुंब ज्यावेळी चुका करते त्यावेळी प्रायश्चित्ताचा पूर्ण विचार करत नाही. कौटुंबिक कलह चाललेले असताना कालांतराने त्याचे होऊ शकणारे भीषण परिणाम कोणाच्या डोळ्यासमोर नसतात. त्यामुळे क्षुल्लक झगडेसुद्धा समाजात कसलाहि विचार न करता लढविले जातात. या झगड्याचे परिणाम फारसे होणार नहीत किंवा ते टाळता येतील असे झगडणाऱ्या जीवांना वाटत असते. परंतु ही गोष्ट देवादिकांनाहि जमलेली नाही. कौरव–पांडव युद्धात कौरवांचा नाश झाला. त्याला कारण मुख्यत: कृष्णच आहे. असे गांधारीला जेव्हा कृष्ण भेटला तेव्हा तिने त्याला सरळ शाप दिला की, आजपासून छत्तीस वर्षांनी तुझे कुटुंबीय आपापसात लढून मरतील आणि तुझा मृत्युहि तुचछ निद्रित अवस्थेत होईल.

**वैज्ञानिक मंत्रशक्ति :** हा श्लोक नैसर्गिक 'अ'कार सोडून एकूण एकसष्ट वर्णशक्तींनी बांधला आहे. त्यात प्रखर शक्ति सतारा वर्णाची आणि मध्यम व सौम्य प्रत्येकी बावीस वर्णांनी बांधलेली आहे.

**उपयोग :** ज्या कुटुंबात झगडे चालतात आणि जीवन अशांत होते त्यांनी झोपी जाण्यापूर्वी या श्लोकाचे तीनदा पठण–स्मरण करावयाचे आहे. त्यानंतर किमान तीन मिनिटे मंत्रातील मुख्य शक्ति जी मननाची ती उपयोगात आणावयाची आह, म्हणजे वर अर्थशक्ति या शीर्षकाखाली

दिलेले विचार चिंतनात आणावयाचे आहेत. या चिंतनामुळे तुमची स्वत:ची मन:स्थिति सुस्थिर होईल इतकेच नव्हे तर आजूबाजूची कलहबीजे नष्ट होण्याच्या मार्गाला लागतील.

## ३२. परमदु:ख, अपघात टाळण्यासाठी

जराविध्यत् पादतले त्वरावांस्तं चाभितस्तज्जिघृक्षुर्जगाम ।
अथापश्य् पुरूषयोगयुकं पीतांबरं लुब्धकोनेक बाहुम् ।।
**–महा.मौसल पर्व ४–२३**

**अर्थशक्ति :** संसारात दु:खाचे आघात, अपघात अनेक रूपाने जीवन वेढून टाकतात. पण कधी कधी या दु:खाची परमावधि होते. असे परमदु:ख अकस्मात येऊन ठेपले म्हणजे आपण परमेश्वराचे स्मरण करतो. ते स्मरण अशा प्रसंगाचे करावे की जेथे कृष्णासारखा परमात्मा स्वत: अशा प्रसंगात होता. कृष्ण लोकशिक्षणासाठी, लोकहितासाठी अवतार घेऊन आला. त्या अवतारात असताना त्याला प्रमादहि लोकशिक्षणासाठी करावे लागले. प्रमाद प्रायश्चित्त देवासही मिळते. हे कृष्णाने स्वत:च्या देहत्याग प्रसंगापर्यंत शिकविले. कृष्णाला एका पारध्याचे हातून बाण लागून देहत्याग करावा लागला. असा त्याचा देहत्यागाचा प्रसंग आहे. महाभारतकारांनी त्याचे वर्णन केले आहे. त्याचा भावार्थ असा, ''शिकाऱ्याने कृष्णाच्या पायावर नेम धरून जलदीने बाण मारला. तो जवळ येऊन पाहतो तो योगयुक्त स्थितीत असलेला, अनेक बाहू असलेला पीतांबरधारी पुरूष त्याच्या नजरेस पडला.'' अर्थात कृष्णाच्या पायांत बाण घुसला होता, आणि कृष्ण देहत्याग

करण्याच्या अवस्थेत होता.

**वैज्ञानिक मंत्र शक्ति :** नैसर्गिक 'अ'कार सोडून एकूण पंच्याऐंशी वर्णांनी हा श्लोक बांधला आहे. त्यापैकी वीस प्रखर शक्तीचे, त्रेचाळीस मध्यम शक्तीचे आणि बावीस सौम्य शक्तीचे आहेत.

**उपयोग :** समजा, तुम्हाला ठेच लागली आहे. अशा वेळीच तुमचा निकटचा नातेवाईक तुमच्यासमोर जिन्यावरून खाली कोसळला व त्याच्या अंगातून रक्त वाहू लागले व तो बेशुद्ध पडला. अशा वेळी तुम्ही आपले दु:ख विसराल आणि समोरच्या ज्येष्ठ नातेवाइकाची चिंता वहाल. त्याच्या दु:खाने आपले दु:ख विसराल. तीच काहीशी परिस्थिती येथे होईल. दूर अंतरावर खोचदार बाण कृष्णाचा पाय भोसकून त्याला देहत्याग करावयास लावतो. म्हणजे परमात्मा देहांत आला तरी सृष्टीचे नियम त्याला सोडीत नाहीत. आणि तोही सोडू इच्छित नाही. तेथे तुम्ही आणि तुमचे दु:ख कोणत्या झाडाचा पाला? या विचाराचे प्रतीक म्हणून पूजेपूर्वी दोन मिनिटे वरील श्लोक तीनदा शांतपणाने म्हणावा व मनन करावे. योग्य व्रत घ्यावे. अपघातदु:ख कमी होते व येतील तेव्हा त्यातील दु:खे फारसे भासणार नाही.

– (स्वराज्य ३०–११–६८ ते १९–७–६९)

---